# बांगलादेशचे आव्हान

वसंत पळशीकर

बांगलादेशच्या स्वातंत्र्यलढ्याची पार्श्वभूमी स्पष्ट करणारी बरीच पुस्तके गेल्या चारपाच महिन्यांत बाजारात आली आहेत. त्यांपैकीच हे एक पुस्तक. इतरांच्या तुलनेने हे कितपत उजवे आहे हे सांगता येत नाही. कारण इतर पुस्तके प्रस्तुत समीक्षकाने पाहिलेली नाहीत. पण, स्वतंत्रपणे, हे एक चांगले पुस्तक आहे. यात सात जणांचे लेख आहेत. 'स्टेट्समन' दैनिकाचे भूतपूर्व संपादक श्री. प्राण चोप्रा यांची विवेचक प्रस्तावना आहे. हार्वर्डच्या तीन अमेरिकन अर्थशास्त्रज्ञांनी लिहिलेले, पूर्व पाकिस्तानचे शोषण होत आले आहे व स्वतंत्र बांगलादेश होणे अपरिहार्य व इष्ट आहे अशा निष्कर्षाप्रत येणारे एक टिपणही परिशिष्ट म्हणून समाविष्ट केले आहे. पाकिस्तानच्या आर्थिक विकासाचे नियोजन करण्यात ज्यांचा वाटा होता असे हे तिघे असल्याने या टिपणाला विशेष महत्त्व आहे.

पाकिस्तानची निर्मिती सुविचारापेक्षा अविचारापोटी, माथेफिरू उन्मादापोटी झाली व त्यामुळे देशाच्या दोन टोकांत विभागल्या गेलेल्या, वांशिक व सांस्कृतिकदृष्ट्या सर्वस्वी भिन्न अशा दोन लोकसमूहांचे मिळून एक एकात्म राष्ट्र कसे घडविता येईल याचा फारसा विचार मुस्लिम लीगच्या नेत्यांनी केला नाही, ही गोष्ट शिशिर गुप्ता यांनी 'फ्रॉम पार्टिशन टु याह्या खान' या लेखात स्पष्ट केली आहे. त्याचप्रमाणे, मुस्लिम लीगचे पुढारीपण मुस्लिम अल्पसंख्य असलेल्या प्रांतांतील मंडळींकडे होते, कारण मुस्लिम लीगची उभारणी याच प्रांतांमधून प्रामुख्याने झाली होती. पाकिस्तानात आज सामील असलेल्या प्रदेशातील मुस्लिम राजकारणी हे नंतर, लोकमताच्या दबावाने मुस्लिम लीगमध्ये खेचले गेले. अर्थ असा की, पंजाब, सिंध, वायव्य सरहद्द प्रांत, या भागांतील पुढारी व बंगालचे मुस्लिम पुढारी यांच्यांत परस्पर सौहार्द, सामंजस्य व एकात्मता कधी निर्माण झालीच नव्हती. भाषा, समाजजीवन, संस्कृती, इ. घटकही त्यादृष्टीने अनुकूल नव्हते. त्यामुळे, पाकिस्तानच्या निर्मितीनंतर जेव्हा स्वाभाविकपणे प्रादेशिक श्रेष्ठींच्या हाती राजकीय व शासकीय नेतृत्व आले तेव्हा पाकिस्तानच्या एकात्मतेवर असह्य ताण पडला. लष्कर, उद्योगधंदे, व्यापार, सनदी नोकर, या सर्व क्षेत्रांत पश्चिम पाकिस्तान व पूर्व बंगाल यांमध्ये काही समतोल असता तर एकात्मता टिकवून धरणे सोपे गेले असते. पण या क्षेत्रात पश्चिम पाकिस्तानवासी मंडळींचे इतके प्राबल्य होते की, इतर सर्व प्रकारच्या सत्तेमुळे राजकीय सत्ताही पश्चिम पाकिस्तानी मंडळींच्या हाती केंद्रित झाली आणि पाकिस्तानात लष्करी अधिकारी - सनदी प्रशासक - उद्योगपती यांची एक गटशाही अस्तित्वात आली. या गटशाहीच्या निर्मितीची पार्श्वभूमी, त्यामागील राजकीय व समाजशास्त्रीय कारणे याविषयींचे शिशिर गुप्तांचे विवेचन संपूर्ण समाधान देत नाही. पण या गटशाहीच्या कारकीर्दीचा इतिहास त्यांनी आटोपशीरपणे दिला आहे. त्यावरून १९५४ सालापासूनच पश्चिम पाकिस्तान व पूर्व पाकिस्तान याच्यांत दरी निर्माण झाल्याचे व ती दिवसेंदिवस रुंदावत गेल्याचे दिसून येते.

मोहम्मद अयूब यांचा 'फ्रॉम मार्शल लॉ टु बांगलादेश' हा लेख बांगलादेशची शोकांतिका उघड करतो. शोकांतिका म्हणण्याचे कारण असे की, त्यात एक अटळपणा होता. म्हणजे असे की, १९७० च्या निवडणुकांमध्ये अवामी लीगने नॅशनल असेंब्लीमध्ये निर्णायक बहुमत मिळण्याएवढ्या जागा जिंकल्या नसत्या तर पश्चिम पाकिस्तानातील राजकीय शक्तींबरोबर हातमिळवणी करून केंद्रात सत्ताधारी होण्यासाठी तिला आपल्या स्वायत्ततेच्या मागणीला मुरड घालावी लागली असती व त्या भागिदारीतून कालांतराने एकात्म पाकिस्तानची निर्मिती होऊ शकली असती. पण निवडणुकांमध्ये १६७ पैकी १६५ जागा जिंकल्याने नॅशनल असेब्लीत बहुमत मिळाले व मग स्वायत्ततेच्या सहा कलमी मागण्यांना मुरड घालण्यासाठी राजकारणी समर्थन उरले नाही. शेख मुजीबुर रहमान यांना लोकशाहीच्या रीतीप्रमाणे पंतप्रधानपद दिले असते तरी, संपूर्ण पाकिस्तानची धुरा खांद्यावर असल्याने त्यांना आपल्या, केवळ पूर्व बंगालचे नेते म्हणून केलेल्या मागण्यांचा फेरविचार करावा लागला असता. पण पाकिस्तानच्या केवळ एकाच भागातील पक्षाच्या हाती केंद्रीय सत्ता देण्यास लष्करी अधिकारी, उद्योगपती, प्रशासक यांच्या गटशाहीचा तसेच पश्चिम पाकिस्तानातील प्रमुख

पुढारी भुट्टो यांच्यासकट सर्व राजकीय पक्षांचा विरोध होता. पुढची शोकांतिका त्यामुळे अटळ ठरली.

तरीही एक मनात येऊन जाते. शेख मुजीबुर रहमान यांची मुत्सद्देगिरी कमी पडली नसती तर पाकिस्तानच्या इतिहासाला वेगळे वळण मिळाले असते. भुट्टोंच्या पक्षाखेरीज इतर पक्षांशी, विशेषतः पख्तून व बलुची गटांशी हातमिळवणी करून त्यांनी राजकारण केले असते तर? कारण, अखेरीस शेख मुजीबूर रहमान यांच्या बाजूला पश्चिम पाकिस्तानातील कोणीच उभे राहिले नाही, इतकी त्यांची मागणी एका टोकाची होती, ही गोष्टही अयूब यांच्या लेखातून स्पष्ट होते.

'इंडियन इंस्टिटयूट ऑफ डिफेन्स स्टडीज अँड अॅनॅलिसिस'चे कर्नल रामराव व ब्रिगेडियर सहानी यांचे लष्करी कारवाई व तिचे परिणाम यांविषयींचे लेख माहितीपूर्ण आहेत. पण ते, साहजिकच, आता काहीसे शिळे झाले आहेत. हीच गोष्ट डॉ. सेनगुप्ता यांच्या लेखाची आहे. पश्चिम पाकिस्तानने पूर्व पाकिस्तानची पिळवणूक पद्धतशीरपणे कशी केली हे त्यांनी तपशीलवार दाखवून दिले आहे. स्थूल मानाने ही गोष्ट सर्वांच्या आता परिचयाची आहे. तपशील व बारकावे जाणू इच्छिणाऱ्यांसाठी त्यांचा लेख आजहि उद्बोधक आहे.

व्ही. पी. दत्त यांनी भारत व पाकिस्तान यांच्या संबंधींचे, अमेरिका, रशिया व चीन यांचे धोरण १९४७ पासून आजवर कसे राहिले, त्यात स्थित्यंतरे कशी घडून आली, व या राष्ट्रांच्या धोरणामागील भूमिका काय ते व्यवस्थितपणे स्पष्ट केले आहे. आपल्या प्रतिस्पर्ध्याविरुद्ध तोल साधण्यासाठी म्हणून करावयाच्या राजकारणाचा एक भाग म्हणूनच त्यांनी या उपखंडातल्या राजकारणाचा विचार केला; त्यातही, भारत अशा शीतयुद्धात्मक राजकारणाविषयी उत्साही नाही हे पाहिल्यावर पाकिस्तानवर अमेरिकेने आपले लक्ष केंद्रित केले, आणि अमेरिकेच्या (व पुढे चीनच्या) प्रभावापासून 'मुक्त' करण्यासाठी रशियाने पाकिस्तानचा अनुनय केला, इत्यादी सुरस आणि चमत्कारिक गोष्टी नजरेसमोर येतात.

पूर्व बंगालमधील स्वातंत्र्ययुद्धाचे पडसाद पश्चिम पाकिस्तानात उठत आहेत का हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. शेवटी या युद्धाने पश्चिम पाकिस्तानी जनतेच्या लोकशाही आकांक्षादेखील धुळीला मिळाल्या आहेत. पख्तुनी, बलुची व सिंधी जनतेलाही स्वायत्तता हवी आहेच. १९६५ साली भारताबरोबर झालेल्या युद्धाच्या वेळी जनता जेवढ्या एकदिलाने शासनाच्या पाठीशी उभी होती तेवढी ती आज नाही हे सोदाहरण देवन बेखिनाथ यांनी आपल्या 'ट्रेमर्स इन वेस्ट पाकिस्तान' या लेखात स्पष्ट केले आहे. पश्चिम पाकिस्तानी उद्योगधंद्यांना पूर्व पाकिस्तानची बाजारपेठ निर्णायक महत्त्वाची होती, ती हुकुमी होती व म्हणून, या युद्धाने ती बाजारपेठ हातची गेल्याने काही उद्योगांवर मंदीचे संकट कोसळेल व त्यातून औद्योगिक अशांतता माजेल हे डॉ. सेनगुप्तांनी स्पष्ट केले आहे, तेही लक्षात घेण्यासारखे आहे. भारताविरुद्ध लष्करी मोहीम काढून या असंतोषाला अन्य दिशेने वाट काढून देण्यात पश्चिम पाकिस्तानी राज्यकर्ते या वेळी यशस्वी होणार नाहीत ही एक शुभ गोष्ट आहे.

प्राण चोप्रा यांची प्रस्तावना सर्व लेखांना एका सूत्रात ओवण्याचे काम करते. आपल्या प्रस्तावनेत शेवटी त्यांनी भारत सरकारच्या निष्क्रियतेबद्दल टीका केली आहे. आज, सहा महिन्यांनंतर, भारत सरकारच्या संयत धोरणाचे, दूरदर्शी राजनीतीचे अनुकूल परिणाम दिसून येत असल्याने या टीकेची वैय्यर्थता उघड होते. मार्च-एप्रिलमध्ये भारत सरकारने हस्तक्षेप केला असता तर पाकिस्तानच्या 'भारताने हा सर्व बनाव घडवून आणला' या आरोपावर जगाने विश्वास ठेवला असता. आज बांगलादेशचा स्वातंत्र्यलढा सच्चा आहे, पाकिस्तानी लष्करी राजवटीचे वर्तन निंद्य आहे आणि भारताविरुद्धचा कांगावा साफ खोटा आहे, या गोष्टी जगन्मान्य झाल्या आहेत. स्वातंत्र्ययुद्धास भारताने आता मदत दिल्यास त्यातून भलता-सलता अर्थ कोणी काढणार नाही. तसेच, १ कोट लोक स्वदेश सोडून पळाले आहेत व त्यांनी परत जावे यासाठी अवश्यक ती कारवाई करण्याचा भारताला अधिकार आहे, ही गोष्टही मान्य होण्याच्या मार्गावर आहे.

हे एक संग्राह्य पुस्तक आहे. पण त्याची किंमत केवळ सधनांनाच परवडण्याएवढी आहे. याचे मराठी भाषांतर रुपयाभरात उपलब्ध करून दिले असते तर प्रकाशकांनी बांगलादेशच्या संदर्भातले आपले

कर्तव्य पार पाडले असे म्हणता आले असते. तशी संधी पॉप्युलरच्या भटकळांना अजूनही आहे.